**पेंच प्रकल्पाच्या डाव्या कालव्यावरील डि उपशाखेवरील अ वितरिका १) ठाणा पाणी वापर संस्था २) झारी पाणी वापर संस्था यांचे कार्यक्षेत्रातील वितरण प्रणालीच्या दुरुस्ती व पुनर्स्थापनेच्या कामास प्रशासकीय मान्यता मिळण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः १०१५/(१७५/१५)/लाक्षेवि (कामे)**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

तारीख: १७/१०/२०१५

**प्रस्तावना -**

पेंच प्रकल्पाचे लागवडीलायक क्षेत्र १,२६,९१३ हे.असून, त्यापैकी १,१२,६०६ हे क्षेत्रावर मजसुप्र अंतर्गत पुनर्स्थापनेची कामे झाली आहेत. उर्वरित १४,३०७ हे. लाभक्षेत्राची पुनर्स्थापना टप्प्या टप्प्याने करणे नियोजित आहे. त्यापैकी यापूर्वी ४३१६.५७ हे. लाभक्षेत्रावर पुनर्स्थापनेस प्रशासकीय मान्यता दिली आहे. उर्वरित क्षेत्रापैकी ६०५.४२ हे.क्षेत्राच्या पुनर्स्थापना करण्याचा प्रस्ताव प्राप्त झाला आहे. पेंच प्रकल्पाच्या राष्ट्रीय महामार्ग क्र.६ च्या खालील लाभक्षेत्रातील वितरण प्रणालीच्या पुनर्बांधणी व नुतनीकरणासाठीचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय-**

या निर्णयाद्वारे पेंच प्रकल्पाच्या डाव्या कालव्यावरील मौदा शाखा कालव्यावरील डि उपशाखेवरील अ वितरिका वरील १) ठाणा पाणी वापर संस्था २) झारी पाणी वापर संस्था यांचे कार्यक्षेत्रातील वितरण प्रणालीच्या विशेष दुरुस्ती व पुनर्स्थापनेच्या कामास सोबतच्या परिशिष्टात दर्शविल्याप्रमाणे रू. १२९.९९ लक्ष रुपयाच्याकामास खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१) महाराष्ट्र सिंचन पध्दतीचे शेतक-यांकडून व्यवस्थापन अधिनियम २००५ मधील कार्यवाही पूर्ण करावी.

२) प्रशासकीय मान्यता रकमेच्या मर्यादेतच कामे पूर्ण करणे बंधनकारक आहे.

३) महाराष्ट्र सिंचन पध्दती शेतक-यांकडून व्यवस्थापन कायदा २००५ अंतर्गत पाणी वापर संस्था स्थापन करुन कायद्यातील तरतुदीनुसार व महाराष्ट्र जलक्षेत्र सुधार प्रकल्पनाच्या मार्गदर्शक तत्वानुसार अंदाजपत्रक करुन सक्षमस्तरावर मान्यता द्यावी.

४) शासन निर्णय क्र. मजसुप्र/१००६/६८८/०६/लाक्षेवि (कामे), दि. १४.०६.२००७ नुसार कंत्राट व्यवस्थापन समिती गठीत करावी.

५) पाणी वापर संस्थेच्या अंतिम लाभधारकापर्यंत पाणी निश्चितपणे मिळेल अशा रितीने कामे पूर्ण करावी.

६) अंदाजपत्रकांना तांत्रीक मान्यता देतांना शासनाच्या प्रचलीत नियमांचे पालन होईल यांची खात्री मुख्य अभियंता यांनी करावी.

७) कालव्याची मातीकामे (झाडे झुडपे काढणे, खेदकाम, भराव काम सेवापथ, निरक्षणपय) यांत्रीकी विभागामार्फत करण्यात यावी.

८) कालव्याच्या दुरुसतीची कामे करतांना ती सलगतेने करावीत जेणेकरून दुरुस्तीचे काम शेतकऱ्यांना लगेचच होईल. अशा पध्दतीने कामाचे योग्य नियोजन करावे.

पेचं प्रकल्पाच्या लाभक्षेत्रातील व राष्ट्रीय महामार्ग क्र.६ च्या खाली पेंच डाव्या कालव्यावरील डी उपशाखेवरील अ वितरिका मधील उपरोक्त पाणी वापर संस्थांच्या कार्यक्षेत्रातील कामांच्या खर्चाचे विवरण दर्शविणारा तक्ता.

| **पेंच उजवा कालवा** | **डी उपशाखेवरील अ वितरिका** | |
|---|---|---|
| विवरण | ठाणा पा.वा.सं., ठाणा | झारी पा.वा.सं., नांदोरा |
| मातीकाम | ८.७९ | २२.०५ |
| बांधकाम दुरुस्ती | ३.१३ | ३६.४१ |
| नवीन बांधकामे | ३.१९ | ११.३ |
| प्रवाह मापक यंत्र | ०.४९ | १.६७ |
| अस्तरीकरण | ७.२५ | १४ |
| एकूण | - | - |
| किरकोळ खर्च ३ टक्के | ०७ | ०.८२ |
| रॉयल्टी | - | - |
| पाणी वापर संस्था निवडणूक खर्च | ०.६३ | ०.८२ |
| **एकूण खर्च** | **२४.१९** | **८८.८४** |
| एकूण एकंदर | **११३.०३** | |
| १५ टक्के अनुषिक खर्च | **१६.१६** | |
| **एकूण** | **१२९.९९** | |

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता लाक्षेवि (कामे) कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये अ.क्र.  वर नांदविण्यात आलेली आहे. या कामासाठी होणारा खर्च "४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे यावरील भांडवली खर्च १९०-सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूक, विस्तार व सुधारणा कार्यक्रम, ११(०१) विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळास भागभांडवली अंशदान (४७०१ जे १५८)" तरतुदीमधून करण्यात यावा. तसेच या योजने करिता आर्थीक तरतुद अपलब्ध झाल्याशिवाय सदर योजनेवर कोणतेही कामे करून दायित्व निर्माण करू नये तसेच निविदा प्रक्रीयाही सुरु करू नये.

शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम भाग पहिला, उपविभाग-३ मधील अ.क्र.४ दि. १७.०४.२०१५मध्ये विहीत केलेल्या खर्चाच्या बाबतीत रु.५ कोटी पर्यंत प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार सदर प्रस्तावास मान्यता देण्यात येत आहे. हा शासन निर्णय प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकारात व आंतरवित्त सल्लागार व सहसचिव यांच्या सहमतीने निर्गमीत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१०१७१६०६०३०७२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ramesh Babubhai Galiyal

Digitally signed by Ramesh Babubhai Galiyal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ramesh Babubhai Galiyal
Date: 2015.10.29 12:24:43 +05'30'

**( र.बा. गलीयाल )**

अवर सचिव

**प्रत,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,

२) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,

३) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई,

४) मा.सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई,

५) मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई,

६) मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई,

७) स्वीय सहायक, मा.मंत्री, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,

८) स्वीय सहायक, मा.राज्यमंत्री, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,

९) स्वीय सहायक, सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,

१०) कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर,

११) आंतरवित्त सल्लागार व सहसचिव,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,

१२) स्वीय सहाय्यक, मुख्य अभियंता (पा) व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,

१३) मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, नागपूर,

१४) अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, नागपूर,

१५) लाक्षेवि (कामे) संग्रहार्थ .